आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना,कृषी यांत्रिकीकरण उपअभियान या योजनेंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिताचा अखर्चित निधी **सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पित** निधीतुन वितरीत करणेबाबत.

**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०१ A४५९)**

**राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०१ A४४१)**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२० / प्र.क्र. ०७ / कार्यासन.६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: १ जून, २०२०.

<u>वाचा -</u>

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२० /प्र.क्र.६४ / अर्थ-३, दि. १६.०४.२०२०.

२) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्रमांक.No.३-१ Revalidation/ २०१५-M&T (I&P) दि. २२ एप्रिल, २०२०.

३) कृषि व पदुम विभाग, नस्ती क्र. कृयायो-०५२० / प्र. क्र.५४ (भाग-३)/१४-अे

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना,कृषी यांत्रिकीकरण उपअभियान या योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (११) कृषि उन्नती योजना,कृषी यांत्रिकीकरण उपअभियान (केंद्र पुरस्कृत योजना ) लेखाशिर्ष २४०१ A४५९ (केंद्र हिस्सा) , ३३- अर्थसहाय्य खाली रु. १७५५.०० लाख इतका तर (०१) (१०) कृषि उन्नती योजना,कृषी अभियांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो.राज्य हिस्सा) लेखाशिर्ष २४०१ A४४१, ३३-अर्थसहाय्य खाली रु. ११७०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १६ एप्रिल,२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याकरिता (जून, २०२० अखेर) अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्यांच्या मर्यादेत ठराविक उद्दीष्टांसाठी निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच केंद्र पुरस्कृत योजनांच्या मागील वर्षामधील निधी वितरणाकरीता वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य केले आहे. या अनुषंगाने कृषी व पदुम विभागाच्या संदर्भाधीन नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरून व कृषि व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र. ३ येथील प्रस्तावास अनुसरुन सन २०१९-२० या वर्षातील अखर्चित निधी करीता उपरोक्त सन २०२०-२१ करीता अर्थसंकल्पीत तरतुदीतुन (०१) (११) कृषि उन्नती योजना,कृषी अभियांत्रिकीकरण (केंद्र पुरस्कृत योजना ) लेखाशिर्ष २४०१ A४५९ (केंद्र हिस्सा) , ३३- अर्थसहाय्य याकरीता खाली रु.१०००.०० लाख इतका तर (०१) (१०) कृषि उन्नती योजना,कृषी अभियांत्रिकीकरण (कें.पु.यो.राज्य हिस्सा) लेखाशिर्ष २४०१ A४४१, ३३-अर्थसहाय्य याकरीता रु. ६६७.०० लाख असा एकुण १६६७.०० लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, (कृषि व पदुम) विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डाऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रक अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत वितरीत निधी केवळ आदिवासी लाभार्थ्यांकरिताच उपयोगात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ येथील परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७७/२०२० व्यय २, दि.१४/०५/२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५०५१५३२१६६७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.06.01 16:43:04 +05'30'

**( किरण कि. पवार )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. प्रधान सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.

६. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.

७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.

८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग